औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास या योजनेअंतर्गत निधी उपलब्ध करुन देणेबाबत (लोणावळा व येवले येथील सहकारी औद्योगिक वसाहती).

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्र.औपासू- २०१८/प्र.क्र.२०१/उद्योग-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २३ जून, २०२०

**<u>संदर्भ</u>** :- १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. आय आय आय पॉलिसी २०१०/ प्र.क्र.७६८/उद्योग २, दि.२२/०२/२०१३.

२) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. औपासू २०१२/ प्र.क्र.२३४/ उद्योग-२, दि. २५/०२/२०१४.

३) दिनांक १९/१२/२०१४ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या दुसऱ्या बैठकीचे इतिवृत्त दि. ०६/०१/२०१५.

४) दि.३१/१२/२०१५रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या तिसऱ्या बैठकीचे इतिवृत्त दि.०८/०३/२०१६

५) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.मऔधो-२०१५/प्र.क्र.३९/उद्योग-२, दि. २८/०३/२०१६.

६) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन शुध्दीपत्रक क्र.औपासू-२०१६/प्र.क्र.२१९/उद्योग-२, दि.२०/१२/२०१६.

७) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. औपासू-२०१६/ प्र.क्र.२२६/ उद्योग-२, दि.२७/१२/२०१६.

८) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. औपासू-२०१६/ प्र.क्र.१९१/ उद्योग-२, दि.०६/०२/२०१७.

९) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. औपासू-२०१६/ प्र.क्र.१९१/ उद्योग-२, दि.२९/०३/२०१७.

१०) उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. औपासू-२०१८/प्र.क्र २०१/उद्योग-२, दिनांक २१/०१/२०१९.

११) मुख्य अभियंता (मुख्या), महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी(पूर्व), मुंबई यांचे जा.क्र./ मु.अ.(मुख्या)/ A७५०९०/ २०२०, दि.२६/०२/२०२०.

**<u>प्रस्तावना</u>** :-

राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास या योजनेअंतर्गत मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील “महाराष्ट्र औद्योगिक पायाभूत सुविधा विकास समिती” च्या दिनांक १९.१२.२०१४ व दिनांक ३१.१२.२०१५ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या दुस-या व तिस-या बैठकीमधील निर्देशानुसार, सहकारी औद्योगिक वसाहतींच्या १० प्रकल्पांच्या कामांकरीता संदर्भाधिन क्र.५,८,९ व १० च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ या कार्यान्वयन यंत्रणेस एकूण रुपये २४३८.०५ लक्ष एवढा निधी वितरीत करण्यात आला आहे. तथापि, प्रत्यक्ष कामे पूर्ण झाल्यावर अंदाजपत्रकीय रकमेपेक्षा कमी खर्च झाल्याचे दिसून आले. मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास

महामंडळ, मुंबई यांनी त्यांच्या दि.२६/०२/२०२० च्या पत्रान्वये प्रस्तुत विषयी रुपये ३४१.९८ लक्ष एवढा निधी अखर्चिक राहीला आहे असे कळविले आहे.

सुकाणू समितीच्या दुस-या व तिस-या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयानुसार, दि.२७/१२/२०१६ च्या शासन निर्णयान्वये लोणावळा सहकारी औद्योगिक वसाहत, नागरगाव जि.पुणे यांना शासन हिस्स्याची ७५% म्हणजे रुपये ३००.३२ लक्ष व येवले सहकारी औद्योगिक वसाहत, नाशिक यांना शासन हिस्स्याची ७५% म्हणजे रुपये ९०.७५ लक्ष एवढी रक्कम वितरीत करण्यास प्रशासकीय मंजूरी देण्यात आली आहे. तद्नंतर दि.२८/०३/२०१६ व दि.२१/०१/२०१९ च्या शासन निर्णयान्वनये लोणावळा सहकारी औद्योगिक वसाहत, नागरगाव जि.पुणे या संस्थेला रुपये १५४.५ लक्ष व येवले सहकारी औद्योगिक वसाहत, नाशिक या संस्थेला रुपये ८३.७५ लक्ष एवढा निधी वितरीत करण्यात आला आहे. ही बाब विचारात घेता सदर संस्थांना प्रशासकीय मंजूरी दिलेल्या रकमेपेक्षा कमी निधी वितरीत केला असल्याने उर्वरीत आवश्यक निधीचे वाटप करणे आवश्यक आहे.

<u>**शासन निर्णय**</u>:-

प्रस्तुत प्रकरणी मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई यांनी त्यांच्या दि.२६/०२/२०२० च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार, लोणावळा सहकारी औद्योगिक वसाहत, नागरगाव जि.पुणे येथील पायाभूत सुविधांची कामे करण्यासाठी मंजूर करण्यात आलेल्या निधीपैकी उर्वरीत रुपये ११०.२५ लक्ष तसेच येवले सहकारी औद्योगिक वसाहत, नाशिक येथील पायाभूत सुविधांची कामे करण्यासाठी मंजूर करण्यात आलेल्या निधीपैकी उर्वरीत रुपये ०.६१ लक्ष असे एकूण रुपये ११०.८६ लक्ष इतकी रक्कम महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे अखर्चिक राहीलेल्या रुपये ३४१.९८ लक्ष एवढ्या रकमेमधून अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने प्रस्तुत निधी अदा केल्यानंतर शिल्लक रकमेच्या विनियोगाचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

३. प्रस्तुत कामांकरीता यापूर्वी प्रशासकीय मंजूरी व निधी वितरण करण्याबाबत दि.२८/०३/२०१६, दि.२७/१२/२०१६ व दि.२१/०१/२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्ती कायम राहतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२००६२३१५०१०६३९१० असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2020.06.26 16:33:51 +05'30'

**( संजय देगांवकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), नागपूर.
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

४) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई.
५) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-४०० ०३२.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
८) मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
९) वित्त विभाग (कार्यासन अर्थसंकल्प-१४/ व्यय-१६), मंत्रालय, मुंबई.
१०) नियोजन विभाग (कार्यासन-१४६१), मंत्रालय मुंबई.
११) कक्ष अधिकारी (प्रशासन-१), उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती (उद्योग-२).